२०१५०४२३१५२८५९४२२७

(303)

शेलारवाडी लघु पाटबंधारे योजना ता.खेड, जि.रत्नागिरी या योजनेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो २००९/(९०/२००९) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०७/०९/२०११

पहावे :- कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र.कोपाविमं/तां-३/शेलारवाडी/७५०/सन-२००९, दि. ९/३/२००९.

प्रस्तावना :-

शेलारवाडी लघु पाटबंधारे योजना ता.खेड, जि.रत्नागिरी या योजनेस शासन निर्णय क्र. लपायो-१३९४/(४६९/९४) खारभूमी दि. ११/१२/१९९५, अन्वये रु. १२६८.३९ लक्ष किंमतीस पुनः प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. पुनः प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना सन १९९२-९३ च्या दरसुची प्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसुचीच्या दरातील वाढ, भूसंपादन किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदल व अनुषंगिक खर्चातील वाढ इत्यादी कारणामुळे वाढ झाल्याने व्दितीय प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांच्या कडून सन २००७-०८ या वर्षाच्या दरसुचीवर आधारीत एकूण रु. ७२५४.२७ लक्ष किंमतीचा प्रस्ताव शासनास मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता व सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

शासन आता या निर्णयान्वये शेलारवाडी लघु पाटबंधारे योजना ता.खेड जि. रत्नागिरी या योजनेचा एकूण अंदाजित खर्च रुपये ७२,५४,२७,४४०/- (रपये बहात्तर कोटी, चौपन्न लक्ष, सत्ताविस हजार, चारशे चाळीस फक्त) यास खालील अटींच्या अधिन राहून व्दितीय प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. (यापैकी रु.६६,९३,१५,६९१/- कामाप्रित्यार्थ व रु.५,६१,११,४९/- अनुषंगिक खर्च) उपशिर्षवार तरतुदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

अटः- १) सदर लघु पाटबंधारे योजनेचे काम व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत समाप्त करावे.

२) शेलारवाडी लघु पाटबंधारे योजनेचे काम ३ वर्षाच्या कालावधीत पुर्ण करण्यात यावे

२.. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५ "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका" कोकण पाटबंधारे विकास महामंडळ भाग

भांडवली अंशदान या शीर्षाखाली खर्ची घालावा व कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९६७८, दि. १६/६/२००९ व अनौपचारिक संदर्भ क्र. ३२७/व्यय-१२, दि. १०/८/२००९ अन्वये त्याविभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता अनुक्रमांक (६४/२०११) वर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता (दवप्र) व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
अधीक्षक अभियंता,ठाणे, कोकण पाटबंधारे मंडळ,ठाणे
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे, चिपळूण.
अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ,ठाणे
उपअभियंता (खारभूमी) मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा १/२(२ प्रर्त) / लपा-१ जलसंपदा विभाग,
जिल्हाधिकारी, रत्नागिरी
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक लपायो २००९/(९०/२००९)/खारभूमी दिनांक ०७/०९/२०११ चे सहपत्र

शेलारवाडी लघु पाटबंधारे योजना ता.खेड, जि. रत्नागिरी, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | रक्कम (रुपये लक्ष) | | एकूण रुपयात |
|---|---|---|---|---|
| | | शिर्षकाभे | मुख्य व शाखा कालवे | |
| १ | 'ए' प्राथमिक | ६०३५०२३ | ११२२६१० | ७१५७६६३३ |
| २ | 'बी' (भूसंपादने) | ९४५३४२०८ | १३६६३९९१ | १०८१९८१९९ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ४०३७९४१३९ | ----- | ४०३७९४१३९ |
| ४ | 'डी' विमोचक | ४४८१११३८० | १६८९६५९२ | ६१७०७९७२ |
| ५ | 'ई'-फॉल | ---- | ३२७१०७ | ३२७१०७ |
| ६ | 'एफ' आरएचटी वर्क्स | ---- | २५१८४०६० | २५१८४०६० |
| ७ | 'जी' पूल (सीटी क्रॉसिंग) | ---- | ६९१८५२६ | ६९१८५२६ |
| ८ | 'एच' एस्केप | ---- | ५५९३८६ | ५५९३८६ |
| ९ | 'के' इमारती | ७१९१७३ | ३२०२५० | १०३९४२३ |
| १० | 'एल मातीकाम | ---- | २१७८३४७४ | २१७८३४७४ |
| ११ | 'एम' वृक्षारोपन | ११५००० | ६९०००० | ८०५००० |
| १२ | 'ओ' संकीर्ण | १००८००० | ३५०८२२ | १३५८८२२ |
| १३ | 'पी' देखभाल | ४०३३१६६१ | १२२७८९ | ४१५५९५० |
| १४ | 'आर' दळणवळण | ७२०५०० | २००००० | ७४०५०० |
| १५ | वितरिका | ---- | १९०१८५०० | १८९१८५०० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | ५६२२५७५८४ | १०७०५८०७ | **६६९३१५६९१** |
| | अनुषंगिक खर्च | --- | --- | **५६१११७४९** |
| | **योजनेची एकूण किंमत** | | --- | **७२५४२७४४०** |

| ठळक वैशिष्टये | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ७८५ हे. |
| नियोजित पाणीसाठा | १६२३४.५० स.घ.मी. |
| पाण्यासाठीची प्रती स.घ.मी. किंमत (रू) | ४४६८४<६६००२ (आर्थिक मापदंडात बसते) |
| | ----- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.१०< १ (आर्थिक मापदंडात बसते) |

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc